डॉ.आनंदीबाई जोशी गौरव पुरस्कार व वंदनीय बाळासाहेब ठाकरे आरोग्यरत्न पुरस्कार या पुरस्कारांतर्गत राज्यातील उत्कृष्ट काम करणाऱ्या डॉक्टर्स,संस्था व इतर आरोग्य सेवेतील अधिकारी व कर्मचारी यांना पुरस्काराद्वारे मानधन देण्याकरिता येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुरमा-२०२५/प्र.क्र.०३/क्षमता बांधणी**
गो.ते.रुग्णालय संकुल, दहावा मजला, संकुल इमारत
मंत्रालय, मुंबई ४००००१
दिनांक : १२ जून,२०२५.

**वाचा :- अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण, माता बाल संगोपन व शालेय आरोग्य, औंध, पुणे यांचे पत्र क्रमांक : राकुकका/अर्थसंकल्प/कक्ष-४/नस्ती क्र.१६/२०२५-२६/जून २०२५/ पुरक मागण्या/ २३२१९-२२२, दि. १६.०५.२०२५**

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भाधीन दिनांक १६.०५.२०२५ च्या पत्रान्वये, अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण, माता बाल संगोपन व शालेय आरोग्य, औंध, पुणे यांनी डॉ.आनंदीबाई जोशी गौरव पुरस्कार व वंदनीय बाळासाहेब ठाकरे आरोग्यरत्न पुरस्कार या पुरस्कारांतर्गत राज्यातील उत्कृष्ट काम करणाऱ्या डॉक्टर्स,संस्था व इतर आरोग्य सेवेतील अधिकारी व कर्मचारी यांना पुरस्काराद्वारे मानधन देण्याकरिता येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता व निधी उपलब्ध करुन देण्याबाबत विनंती केलेली आहे.

**शासन निर्णय :-**

डॉ.आनंदीबाई जोशी गौरव पुरस्कार व वंदनीय बाळासाहेब ठाकरे आरोग्यरत्न पुरस्कार या पुरस्कारांतर्गत राज्यातील उत्कृष्ट काम करणाऱ्या डॉक्टर्स,संस्था व इतर आरोग्य सेवेतील अधिकारी व कर्मचारी यांना पुरस्काराद्वारे मानधन देण्याकरिता येणाऱ्या रु.८०,००,०००/- (अक्षरी रु. ऐंशी लक्ष फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च लेखाशीर्ष २२३५३१८६, १०३-महिला कल्याण, (०१) महिला कल्याण योजना, (०१)/(०१) आनंदीबाई जोशी गौरव पुरस्कार (कार्यक्रम), ५०-इतर खर्च अंतर्गत सन २०२५-२६ च्या द्वितीय अधिवेशनात मंजूर होणाऱ्या पुरवणी मागणीद्वारे प्राप्त होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६१२१०१४०८०८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARVIND BHIMRAO MORE

Digitally signed by ARVIND BHIMRAO MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=203af2dfba7db2a4824298a34f2c9294f93396f53d7f87cd4d69fecf5cf7005f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9246B8CCD2E2CB10707678D45EA1AD26CC1E4D7BFF7BD2AA1F253A716B8C448B, cn=ARVIND BHIMRAO MORE
Date: 2025.06.12 10:15:12 +05'30'

**(अ.भि.मोरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) महालेखापाल, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १/ २, मुंबई/ नागपूर.
२) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३) संचालक (१), आरोग्य सेवा, मुंबई.
४) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण, माता बाल संगोपन व शालेय आरोग्य, औंध, पुणे
५) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
६) निवडनस्ती (क्षमता बांधणी ).